अधिसंख्य पद निर्माण करणेबाबत....
श्री.अजित शंकर कदम, शिधावाटप निरीक्षक.

**महाराष्ट्र शासन**
**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग**
**शासन आदेश क्र.:-आस्थाप्र-६८२४/प्र.क्र.१५६/ना.पु.१५**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक १५ एप्रिल, २०२५.

**संदर्भ** :-१) दिव्यांग व्यक्ती हक्क अधिनियम, २०१६.
२) सर जे. जे. समूह रुग्णालय, मुंबई यांचे प्रमाणपत्र क्र.MH२३९०६१९८६०३६१११५, दि.२३.०३.२०२४.
३) नियंत्रक शिधावाटप व संचालक नागरी पुरवठा,मुंबई यांचे पत्र क्र.निशि/आस्था/४-अ/ प्र.क्र.७८/२०२४/जा.२०७, दि.२९.०४.२०२४.
४) मा.अपर मुख्य सचिव(सेवा) यांच्या अध्यक्षतेखाली उप समितीचे इतिवृत्त दि.१३.१२.२०२४.
५) मा.मुख्य सचिव, म. रा. यांच्या अध्यक्षतेखाली उच्चस्तरीय सचिव समितीचे इतिवृत्त दि.२९.०१.२०२५.

**प्रस्तावना:-**

श्री.अजित शंकर कदम हे शिधावाटप निरीक्षक पदावर कार्यरत असतांना त्यांचा दि.१८.११.२०१८ रोजी अपघात झाला. सदर अपघातात त्यांना दिव्यांगत्व आलेले असून त्यांचे दोन्ही पाय व वरचे बाहू बाधीत झालेले असल्यानें त्यांना शारीरीक हालचाल करणे शक्य नाही. त्यास अनुसरुन श्री. कदम, शि. नि. यांनी सर जे.जे. रुग्णालय, मुंबई येथून तपासणी केली. तपासणीअंती प्राप्त केलेल्या दिव्यांगत्वाचे प्रमाणपत्रानुसार श्री. कदम यांना Locomotor Disability या प्रकारातील Spinal cord injury/Quadiplagia मधील ८०% प्रमाणात कायम दिव्यांगत्व आलेले आहे. श्री. कदम यांना शारिरीक हालचाल करणे शक्य नसल्यामुळे ते दि.१९.११.२०१८ पासून कार्यालयात अनुपस्थित आहेत.

२. दिव्यांग व्यक्ती हक्क अधिनियम, २०१६ च्या कलम २० (४) येथील तरतुदीनुसार शासकीय कर्मचाऱ्यास सेवेत असतांना दिव्यांगत्व प्राप्त झाल्यास, अशा कर्मचाऱ्यास सेवेतून कमी अथवा पदावनत करता येणार नाही, अशी तरतूद आहे. अशा दिव्यांगत्वामुळे काम करीत असलेल्या पदासाठी योग्य ठरत नसल्यास समान वेतनश्रेणीच्या अन्य पदावर स्थानांतरण करता येईल. त्याचप्रमाणे असे समावेशन शक्य नसल्यास जोपर्यंत अशा कर्मचाऱ्यासाठी योग्य पद उपलब्ध होत नाही. तोपर्यंत किंवा त्यांच्या सेवानिवृत्तीच्या दिनांकापर्यंत यापैकी जे अगोदर घडेल इतक्या कालावधीसाठी अधिसंख्य पद निर्माण करण्याची तरतूद आहे.

३. श्री. अजित कदम, शिधावाटप निरीक्षक हे शारीरिक हालचाल करण्यास असमर्थ असून त्यांच्या शारिरीक हालचालीमध्ये सुधारणा होण्यास किती कालावधी लागेल याबाबत सांशकता असल्यामुळे शि.नि. या पदाचे तसेच अन्य कोणत्याही पदाचे कामकाज करण्यास ते असमर्थ असल्याचे श्री. कदम यांनी नियंत्रक, शिधावाटप व संचालक नागरी पुरवठा, मुंबई यांना कळविले आहे. त्यानुसार नियंत्रक शिधावाटप व संचालक नागरी पुरवठा, मुंबई यांनी श्री. अजित कदम, शिधावाटप निरीक्षक यांच्यासाठी एक अधिसंख्य पद निर्माण करण्याचा प्रस्ताव दि.२९.०४.२०२४ रोजीच्या पत्रान्वये शासनास सादर केला आहे. वैद्यकिय मंडळ, सर जे.

जे. समूह रुग्णालय, मुंबई यांचे दि.२३.०३.२०२४ रोजीचे दिव्यांगत्व प्रमाणपत्र व दिव्यांग व्यक्ती हक्क अधिनियम, २०१६ च्या कलम २० (४) येथील तरतूदी विचारात घेऊन श्री.अजित कदम, शिधावाटप निरीक्षक (वेतनस्तर: एस-८:२५५००-८११००) यांचेसाठी योग्य पद उपलब्ध होत नाही, तोपर्यंत किंवा त्यांच्या नियतवयमानानुसार सेवानिवृत्तीच्या दिनांकापर्यंत अथवा अन्य कारणांमुळे पद रिक्त होईल यापैकी जे अगोदर घडेल त्या कालावधीसाठी दि.१९.११.२०१८ पासून ०१ अधिसंख्य पद निर्माण करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय:-</u>**

श्री.अजित शंकर कदम, शिधावाटप निरीक्षक यांच्याबाबतीत वैद्यकिय मंडळ, सर जे. जे. समूह रुग्णालय, मुंबई यांचे दि.२३.०३.२०२४ रोजीचे दिव्यांगत्व प्रमाणपत्र व दिव्यांग व्यक्ती हक्क अधिनियम, २०१६ च्या कलम २० (४) येथील तरतूदी विचारात घेऊन श्री. अजित कदम, शिधावाटप निरीक्षक यांचेसाठी योग्य पद उपलब्ध होत नाही तोपर्यंत किंवा त्यांच्या नियतवयमानानुसार सेवानिवृत्तीच्या दिनांकापर्यंत अथवा अन्य कारणांमुळे पद रिक्त होईल यापैकी जे अगोदर घडेल त्या कालावधीसाठी दि.१९.११.२०१८ पासून वेतनस्तर एस-८:२५५००-८११०० या वेतनस्तरात ०१ अधिसंख्य पद निर्माण करण्यास मंजूरी देण्यात येत आहे.

२. सदर अधिसंख्य पद श्री. अजित शंकर कदम, शिधावाटप निरीक्षक यांची सेवानिवृत्ती अथवा ते सेवेत असेपर्यंत अस्तित्वात राहील. त्यानंतर सदर पद आपोआप निरसित होईल.

३. सदर शासन निर्णय वित्त विभागाने त्यांच्या अनौपचारीक संदर्भ क्र.७४/आपुक दि.२०.०२.२०२५ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या <u>www.maharashtra.gov.in</u> या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२५०४१५१७५०४५१९०६ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

POOJA PRASAD MANKAR

Digitally signed by POOJA PRASAD MANKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=FOOD CIVIL SUPPLY AND CONSUMER PROTECTION DEPARTMENT, 2.5.4.20=2587c101141ff0822d1f39f866ca3537dfc0e52728f898604a75ff77b46e7415, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=3063036B7F64E995ED6A8BC7C9FBB1A5A10E6562F73D65107AD668D006B3B164, cn=POOJA PRASAD MANKAR
Date: 2025.04.15 17:51:55 +05'30'

**(पूजा मानकर)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. मंत्री, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) सचिव,अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
३) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य-१ /२, मुंबई/नागपूर.
४) महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य-१/२, मुंबई/नागपूर.
५) नियंत्रक शिधावाटप व संचालक नागरी पुरवठा, मुंबई.
६) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
७) श्री. अजित शंकर कदम, शिधावाटप निरीक्षक (यांना नियंत्रक शिधावाटप व संचालक नागरी पुरवठा, मुंबई यांचेमार्फत).
८) निवडनस्ती, ना.पु.१५.